## जनसंघटन आणि आयडिऑलॉजी

क्रांतिकारक सामाजिक परिवर्तनाच्या कामात पडलेल्या अनेक तरुण-तरुणींचे प्रस्थापित राजकीय पक्षांशी वा चळवळींशी जुळत नाही. स्वतंत्रपणे लहान संघटना स्थापन करून छोट्याशा क्षेत्रात अशा तरुण-तरुणींचे गट देशभर काम करीत आहेत असे आढळते. प्रस्थापित राजकीय पक्ष लोकांना आपल्या हितसंबंधांसाठी राबवून घेतात, त्यांना खऱ्या अर्थाने क्रांतिकारक समाजपरिवर्तनाची आच राहिलेली नाही हा त्यांचा आक्षेप आहे. संसदीय लोकशाही प्रक्रियेच्या चौकटीत राहून केलेल्या निवडणूकप्रधान सत्तास्पर्धेच्या राजकारणातून क्रांतिकारक समाजपरिवर्तन घडून येणार नाही असा त्यांचा ठाम सिद्धांत आहे. 'पॉवर टु द पीपल' ही त्यांची घोषणा, हे त्यांचे ब्रीदवाक्य. लोकांसाठी नव्हे तर, लोकांबरोबर राहून, जनसंघटना बांधून आणि जनआंदोलने उभारून लोकांची सत्ता प्रस्थापित केली पाहिजे याविषयी त्यांचा आग्रह असतो. 'लोक' वा 'जन' हा शब्द वापरीत असताना दलित, शोषित जनता त्यांना अभिप्रेत असते.

गरीब, शोषित व कष्टकरी जनतेबद्दलचा जिव्हाळा, लोकांमध्ये मिसळून त्यांच्या बाजूने लढे उभारण्याची धडपड, लोकांशी समरस व्हावयाच्या इच्छेतून पत्करलेले भणंग जीवन ही या तरुण-तरुणींची लोभस वैशिष्ट्ये आहेत. अशा तरुण-तरुणींसह मोकळेपणाने चर्चा करण्याचा योग अलीकडच्या काळात वारंवार येतो आहे. जनसामान्यांना केंद्रस्थानी ठेवून विचार करण्याच्या, कार्य करण्याच्या त्यांच्या प्रयत्नांत काही गंभीर त्रुटी जाणवल्या. त्यासंबंधी चर्चा उपस्थित करण्याचे येथे मनात आहे.

आपल्या पुढारीपणाखाली चालणाऱ्या राजकारणाला बळ देणारा फौजफाटा म्हणून लोकांना वापरून घ्यायचे नाही, राजकारण लोकांच्या अधिक्रमावर आणि त्यांच्या निर्णयांच्या आधारे चालावे अशी भूमिका व्यवहारात राबवायची झाल्यास कार्यकर्त्याच्या निष्ठेचा आशय काय असला पाहिजे आणि त्याने कोणती पथ्ये काटेकोरपणे पाळली पाहिजेत याचा पुरेसा विचार केलेला नाही ही गंभीर त्रुटी जाणवते. अशी व्यक्ती व शब्द प्रामाण्य वृत्ती आढळते. एकेका गटाची स्वतःची अशी निवडलेली विचारप्रणाली (आयडियालॉजी) आहे आणि या विचारप्रणालीने क्रांतिकारक सामाजिक परिवर्तनाच्या क्षेत्रातील प्रश्नांना उत्तरे दिलेलीच आहेत अशी फार पक्की समजूत युक्तिवादातून व्यक्त होते. विचारप्रणालीने निर्दिष्ट केलेल्या पूर्वनिश्चित मार्गाने भविष्यात घडणाऱ्या परिवर्तनाला आपापल्या परीने हातभार लावण्याची कामगिरी तेवढी कार्यकर्त्यांच्या व लोकांच्या वाट्यास उरते. यात अर्थाने विचारप्रणालीवर पकड असल्याच्या नात्याने कार्यकर्ता हा एका विशेष स्थानी असतो आणि त्याच्या शिकवणीनुसार लोकांनी नेहमी आपण होऊन वागावे अशी कल्पना असते. जनाधारित क्रांतीची गोष्ट करता करता आपण सर्वच कार्यकर्त्यांच्या हाती नियंत्रण व पुढारीपण सुपूर्द करीत आहोत ही गोष्ट लक्षात येत नाही.

आणि लक्षात आणून दिली तर अस्वस्थता वाढते. आपल्याला काही विशेष गुप्तज्ञान झालेले आहे आणि आपल्या कळण्यानुसार लोक वळले तरच पुढे जाऊन क्रांती होणार, हे मनात फार पक्के असते. समाजपरिवर्तनाची लढाई करण्यासाठी सर्वप्रथम राज्यसत्तेवर आरूढ व्हावे लागणारच. मात्र राज्यसत्तेच्या उलथापालथीपर्यंत बाकीची परिवर्तने थांबवून ठेवू असे म्हणणेही मूर्खपणाचे आहे. राज्यसत्तेतील बदल हा एकदम होणारा व जाणवणारा असला तरी मुळात परिवर्तन ही प्रक्रिया असते. दीर्घकाल घेणारी प्रक्रिया असते. सर्वंकष परिवर्तनासाठी सर्व बाजूंनी केलेले जोमाचे प्रयत्न अत्यावश्यक आहेत.

ग्रामीण कष्टकऱ्यांच्या जीवनाची रचनाच अशी आहे की तेथील शोषित-दलित वर्गांच्या आर्थिक समस्या सोडवायला घेणाऱ्या चळवळीला त्यांच्या जीवनसंघर्षांची सर्व अंगे व्यापणे भाग पडते. सामाजिक दडपणूक, सांस्कृतिक कुतर्कता, शैक्षणिक मागासलेपण, अशा अनेक अंगांतून कष्टकऱ्यांचा आशा-आकांक्षांचा उच्छेद होत असतो. कोणतेही जनआंदोलन चालायचे तर चळवळ करणाऱ्या जनसमूहांच्या आशा-आकांक्षा मूर्त स्वरूपात संघटित करणारी जनसंघटना आवश्यक आहे. कष्टकरी समूहांच्या लढ्यासाठी निघालेला कार्यकर्ता विचारप्रणालीने परिपूर्ण शस्त्रसज्ज नसेल तर तो जिंकणार कसा, अशी घोर शंका त्यांच्या मनाला पडते. दुसरीकडे, कार्यकर्त्याजवळच्या विचारप्रणालीनुसार, त्याच्या शिकवणीनुसार

लोकांनी कृती कराव्यात असे म्हटले तर आजवरच्या राजकीय पक्षांच्या आणि चळवळींच्या वळणाचेच हे काम झाले ही गोष्टही नाकारता येत नाही. हा पेच बिनतोड वाटतो.

अमूक एका विचारप्रणालीचा भाग म्हणून निर्दिष्ट केलेल्या मार्गाने, साधनांनी आणि तंत्रांनीच केवळ परिवर्तन घडून येणार आहे, किंवा आले पाहिजे, याला कार्यकर्ता कवटाळून बसतो तेव्हाच हा पेच बिनतोड उरतो. तिने स्वीकारलेल्या वैशिष्ट्यपूर्ण विचारप्रणालीचा एक भाग म्हणूनच व्यक्ती कार्यकर्ता बनते, आणि त्या विचारप्रणालीचा भाग म्हणूनच लोकांबरोबर राहून काम करण्याचे पत्करते, ही गोष्ट खरीच आहे. लोक कार्यकर्ते नसले तरी तेही एक विचारप्रणाली जगत असतात ही गोष्ट मात्र कार्यकर्ता तेवढी ध्यानात घेत नाही. आपली विचारप्रणाली घेऊन कार्यकर्ता लोकांमध्ये जातो तेव्हा त्याची त्याच्यापेक्षा भिन्न विचारप्रणाली धारण करणाऱ्या लोकांची गाठ पडते.

चळवळीमधील खुद्द समुदायांचा सहभाग वाढविणारी, त्यांच्यातले ‘स्व’त्व जागवणारी व म्हणूनच ‘स्व’राज्याकडे वाटचाल करू पाहणारी संघटना कार्यकर्त्यांच्या समितीच्या स्वरूपात उभी राहू शकत नाही. (मात्र) शहरी जीवनाचा अनुभव असलेले सुशिक्षण कार्यकर्ते ग्रामीण भागात गेल्याखेरीज तिथल्या चळवळी नीट आकार घेऊन रुजणे कठीण आहे. परंतु तळातून नेतृत्व निर्माण केल्याखेरीज क्रांतिकारी लढा उभारला जाणे अशक्य आहे. जनसंघटनेत काम करणाऱ्या कार्यकर्त्यांना राजकीय भूमिका ही असतेच. त्यांच्या संघटनेतील व्यवहाराला आधारभूत ठरतील अशी किमान तत्त्वे असतातच व या किमान तत्त्वांमधून कोणती तरी राजकीय मते, विचारप्रणालीही व्यक्त होत असतेच.

"कष्टकरी आणि दडपलेल्या वर्गांना आपने मनुष्यत्व, आपले स्वत्व हेच मुळी संघर्षातून गवसते व त्यांच्या जगण्यास मूलाधार असणारे किमान आर्थिक हक्कही संघर्षातूनच प्रस्थापित होतात. त्यामुळे संघर्षाचे हे काम विधायक म्हणूनच पाहिले पाहिजे. तथाकथित या गाठीभेटीतून, संवादातून आपल्या विचारप्रणालीत आपणास काहीही बदल करावा लागणार नाही, लोकांना मात्र त्यांची विचारप्रणाली टाकून आपली विचारप्रणाली घ्यायला हवी आहे, या धारणेत पुढील सर्व घोटाळ्याचे बीज आहे. आपली एक विचारप्रणाली आहे. आणि ती अधिक विचारांतून, अनुभवातून आणि निरीक्षणातून बदलू शकते. विधायक कामांमध्ये होणारा वेळेचा व सांघिक शक्तीचा अपव्यय प्रचंड प्रमाणावर होतो, तसेच लोकांमधील स्वतःच्या सामूहिक शक्तीवरील विश्वास जागृत न होता कार्यकर्त्यांवर व दयाबुद्धीवर विसंबून राहण्याची प्रवृत्ती लोकांमध्ये वाढीस लागते.”

जनसामान्य आपण होऊन संघाटित होतील ही शक्यता कोणालाच वाटत नाही. जनसामान्यांना संघटित करण्यासाठी क्रांतिकारक समाजपरिवर्तनाला बांधिलकी असणारा कार्यकर्ता आवश्यक आहे ही मान्यताही सार्वत्रिक आढळते. इथे पहिला प्रश्न उपस्थित होतो. आजवरच्या पारंपरिक संघटना या जनसंघटना होऊ शकल्या नाहीत कारण या संघटनांत जनसामान्यांकडे पुढाऱ्यांच्या मागून जाण्याचे, फौजफाट्याचे काम असे. नव्या अर्थाच्या जनसंघटनेचे वैशिष्ट्य हे असेल की तिचे पुढारीपण जनच करतील. अशी संघटना उभारण्यात कार्यकर्त्याची भूमिका कोणची असायला हवी, आणि ती त्याने कशी पार पाडावी? हा तो प्रश्न होय.

जनसंघटनेचे, समाजक्रांतीचे काम कार्यकर्ता हाती घेतो ते त्याच्यापाशी एक विचारप्रणाली असते म्हणूनच, ही गोष्ट खरी आहे. मूल्यनिष्ठा, ध्येये, वास्तवाचे विश्लेषण, परिवर्तनाची नीती (स्ट्रॅटेजी), साध्य-साधनविचार, परिवर्तनात्मक कृती, कार्यपद्धती व तंत्रे, इत्यादी विचारप्रणालीचे घटक म्हणता येतील. यापैकी कोणत्या घटकांच्या बाबतीत लोकांनी कार्यकर्त्यांकडून सरळसरळ शिकवण स्वीकारावी अशी अपेक्षा असते? अनुभव असा आहे की, सर्वच बाबतीत कार्यकर्त्यानेच लोकांना शिकवण देण्याची गरज राहील, अशी कार्यकर्त्यांची ठाम खात्री आढळते पण एकदा का कार्यकर्ते व लोक यांच्यात हे नाते स्वीकारले (वा निर्माण झाले) की संघटना आजच्या पारंपरिक राजकीय पक्षांच्या वा ट्रेड युनियन्सच्या वळणानेच अटळपणे जाऊ लागतात. हीदेखील अनुभवाची गोष्ट आहे. संघटनेत काही कार्यकर्ते लोकांच्या

मधून आल्याने याबाबतीत फरक पडत नाही.

कार्यकर्त्याला एक राजकीय भूमिका असतेच असते, त्याची एक विचारप्रणाली असतेच असते एवढे म्हटल्याने पुरेसे होत नाही. स्वत:च्या भूमिकेकडे, विचारप्रणालीकडे तो कोणत्या वृत्तीने पाहतो, त्यांचा स्वीकार कसा करतो याला विशेष महत्त्व आहे. विचारप्रणालीतील मूल्यनिष्ठा आणि ध्येये हे दोन घटक त्यातल्या त्यात स्थिर, अविचल मानता येतील. ही स्थिरता वा अविचलतादेखील ‘त्यातल्या त्यात’ या मर्यादेतच आहे हे लक्षात घेतले पाहिजे. मी समतेचे मूल्य मानीत असेन पण ‘समता' या मूल्याचा आशय अनुभवातून बदलत जाऊ शकतो किंवा अन्य मूल्यांच्या संदर्भात ‘समते’ला कोणता क्रम द्यावा वा किती वजन द्यावे याविषयीची माझी समज, धारणा बदलू शकते. आणि असे झाले की मी समोर ठेवलेल्या ध्येयातही बदल होऊ शकतो. विचारप्रणालीतील इतर घटकांच्या बाबतीत तर त्यांचे अस्थायी स्वरूप अधिकच स्पष्ट आहे. अनुभव, वृत्ती यांतून सर्व गोष्टींचा पुनर्विचार सतत चालत राहील अशी प्रायोगिक वृत्ती स्वीकारणे कार्यकर्त्यास फार अवघड जाते हा अनुभव आहे.

विचारप्रणालीची गुरुकिल्ली आपणास गवसलेली आहे अशी भूमिका घेतल्यावर सूत्रे कधीच लोकांच्या हाती देता येत नाहीत. आणि कार्यकर्ते आणि जनसामान्य यांच्यात समानतेचे नाते प्रस्थापित होऊ शकत नाही.

लोकांचे स्वत्व जागे करण्याची गोष्ट बोलणाऱ्या कार्यकर्त्यांचा कोठेतरी लोकांच्या विचारशक्तीवर विश्वास नसतो. कार्यकर्त्यांजवळ विचारप्रणाली, ज्ञान, परिस्थितीचे विश्लेषण, पुढारीपण अशा अनेक गोष्टी अधिकच्या असतात आणि सतत त्या कार्यकर्त्यांकडून लोकांनी घ्यायच्या असतात हे फार ठाम गृहितकृत्य आढळते.

पण एकदा हे पहिले पाऊल चुकीचे पडले की नंतरची वाट अटळपणे कार्यकर्त्यांवर अधिष्ठित समितीच्या वा पक्षाच्या एकाधिकारवादी रचनेकडे आपणास नेते. कारण लोकांच्या भल्यासाठी केंद्रीय राज्यसत्ता आपल्या हातात नेहमीच असावी याची आवश्यकता कार्यकर्त्यांना वाटते.

लोकांची वाटचाल स्वराज्याच्या दिशेने व्हावी हे जर एक ध्येय असेल तर लोकांच्या विचारशक्तीवर व स्वतंत्रतेवर ठाम विश्वास ठेवूनच त्यांची मुहूर्तमेढ रोवता येणार आहे.

सामान्यतः असे आढळते की क्रांतिकारक समाजपरिवर्तनासाठी बद्ध असलेल्या कार्यकर्त्यांची खरी बांधिलकी अमूर्त संकल्पनांना असते. ती जिवंत, हाडामांसाच्या लोकांना असत नाही. मानवनिर्मित संकल्पना या अवजारांसारख्या माणसाच्या वापरासाठी आहेत हे भान सुटून त्या संकल्पनाच माणसावर स्वार होतात, त्यांना देव्हाऱ्यात बसवून माणूस त्यांची गुलामी पत्करतो, या आशयाचे मार्क्सचे विवेचन कार्यकर्त्यांच्या संदर्भात प्रत्ययास येते.

क्रांतिकारिक समाजपरिवर्तनाचे काम करणाऱ्या पंचविशी-तिशीतल्या तरुण-तरुणींच्या तोंडी हल्ली 'जनसंघटना’, 'जनसत्ता' असे नवे शब्द आढळतात. ‘पीपल्स ऑर्गनायझेशन’, ‘पॉवर टु द पीपल’ असे इंग्रजीतले शब्दप्रयोग आहेत. प्रचलित राजकीय पक्ष व सामाजिक परिवर्तनाच्या चळवळी यांच्याविषयी खोल व तीव्र अश्रद्धा आणि घृणा त्यांच्या ठिकाणी आढळते. या राजकीय पक्षांनी आणि सामाजिक चळवळींना घडून येणाऱ्या परिवर्तनातून लोकांची दलित, शोषित अवस्था तशीच राहते, राज्यकर्ते आणि प्रजानन ही विभागणी कायम राहते असा त्यांचा अनुभवसिद्ध आक्षेप आहे.

या तरुणतरुणींशी संवाद करण्याचा योग अलीकडच्या वर्ष दोन वर्षांत येत आहे. प्रस्थापितांची अश्रद्धा, सामाजिक परिवर्तनाच्या जुन्या रुळलेल्या रीतींवरील अविश्वास ही या तरुण-तरुणांच्या ठिकाणची लोभस वैशिष्ट्ये आहेत. यांच्याबरोबर होणाऱ्या चर्चांमध्ये पुनःपुन्हा उपस्थित होणाऱ्या काही प्रश्नांची मांडणी करावयाचे येथे मनात आहे.

क्रांतिकारक समाजपरिवर्तनासाठी निघालेल्या कार्यकर्त्याने ‘लोकांच्या मुक्तते’साठी उद्धारकर्ता म्हणून काम करू नये;

स्वतःच्या मुक्ततेसाठी प्रयत्न करणाऱ्या लोकांना, त्यांच्याबरोबर राहून, त्यांच्यातील एक होऊन साथ द्यावी, अशी एक प्राथमिक मांडणी केली जाते. याविषयी या मंडळींचा फार आग्रह असतो. कार्यकर्ते आणि लोक यांच्यात समानतेचे नाते असले पाहिजे असेही त्यांचे म्हणणे असते.

पण या भूमिकेच्या स्वीकाराचा संपूर्ण अर्थ पचविण्याची तयारी आढळत नाही. किंबहुना असेही म्हणता येईल की आपण काय म्हणत आहोत त्याचा अर्थ पूर्णपणे त्यांना उमगलेला नाही असे अनुभवाला येत राहते.

कार्यकर्त्याच्या ठिकाणी काही विशेष असते. एरवी त्याला उद्देशून कार्यकर्ता हा शब्द वापरणे निरर्थक ठरेल. कार्यकर्त्याचे हे विशेषत्व कशात असते? कार्यकर्ता जर असा विशेष गुणसंपन्न असेल तर मग त्याच्यात आणि लोकांमध्ये अटळपणे काही अंतर निर्माण होणार. मग त्यांच्यात समानतेचे नाते कसे काय प्रस्थापित होईल?

या दोन प्रश्नांशी गाडी अडखळते. काही वेळा तर ती चिखलात रुतल्यासारखी होते.

विचारप्रणालीची (आयडियालॉजी) गुरुकिल्ली आपणापाशी आहे, या गुरुकिल्लीच्या वापराने क्रांतीच्या मार्गात वेळोवेळी उपस्थित होणाऱ्या सर्व प्रश्नांची उत्तरे आपणास सापडतील; नव्हे, कोणते प्रश्न पडतील आणि त्यांची उत्तरे काय या दोन्हींचे, आजच, विचारप्रणालीच्या साहाय्याने आपणास अंतर्ज्ञान प्राप्त झालेले आहे, याविषयी ही तरुण मंडळी फार ठाम व निश्चिंत असतात. कार्यकर्त्याचे विशेषत्व या त्याच्या हाती असलेल्या हुकुमी एक्क्यात आहे, असे त्यांचे आग्रहाचे प्रतिपादन असते.

कार्यकर्ता स्वतः आपल्या विचारप्रणालीत सुधार करीत राहिला तरी, लोकांच्या संदर्भात तो, अटळपणे, स्वतःकडे सर्वज्ञाची भूमिका घेतो असे येथे घडते. या सर्वज्ञतेच्या जोरावर कार्यकर्त्याचे संघटनेवर व लोकांवर नियंत्रण प्रस्थापित केले जाते.

पण कार्यकत्याच्या ठिकाणी काही विशेष तर असतेच. सामान्यतः तसे नसते तर तो उठून लोकांमध्ये काम करण्यास कशासाठी जाईल? अशा कार्यकर्त्याच्या अभावी लोकही स्वतः होऊन संघटित होतात असे आढळत नाही. उत्स्फूर्तपणे लोक संतापून उठतात, पण त्या संतापातून घडणारी विध्वंसक कृती क्षणिक असते. दीर्घकाळ टिकून राहणारी व सातत्याने काम करणारी संघटना बांधण्यासाठी कार्यकर्त्यांची जरूरी भासते.

काही विशेष असूनही कार्यकर्त्यांचे व लोकांचे संबंध समानत्वाचे कसे प्रस्थापित होतील? संघटना उभारणीत, आंदोलनात कार्यकर्त्याचे विशेष कर्तृत्व कामी लागत असतानाही लोकच पुढारी आहेत अशी नव्या धर्तीची संघटना कशी बांधली जाईल?

जनसामान्यांनीच स्वतः आपले पुढारीपण करावे असा आपला आग्रह का आहे, हा प्रश्न कार्यकर्त्याने विचारण्याची गरज आहे. 'जनसंघटना', 'जनसत्ता' ही एक नवी शाद्बिक टूम नसेल तर, माणसाविषयी एक विशिष्ट प्रतिमा आपण मानतो, माणसा-माणसांतील संबंधांविषयी एक विशिष्ट धारणा आपण बाळगतो, आणि त्या प्रत्यक्षात साकार करावयाच्या असतील तर व्यवहार पहिल्यापासून त्या प्रतिमेशी व धारणेशी सुसंगत असला पाहिजे, असे या प्रश्नाचे उत्तर येते. आत्मज्ञानाची व सृजनाची क्षमता ही माणसाची व्यवच्छेदक लक्षणे आहेत, आणि त्याच्या ठिकाणचे हे गुणविशेष टिकून राहण्यात त्याचे माणूसपण आहे, ही माणसाविषयीची प्रतिमा या आग्रहाच्या मुळाशी आहे. ज्याप्रकारच्या संबंधामुळे माणूस दुसऱ्याचा अंकित होतो त्याप्रकारचा संबंध त्याच्या माणूसपणाला खच्ची करणारा ठरतो ही संबंधविषयक धारणा या आग्रहाच्या मुळाशी आहे. आत्मज्ञानसंपन्न प्रतिभावंत व्यक्ती आपोआप जन्मास येत नाही. त्यासाठी व्यक्तीला साधना करावी लागते. अशी साधना करण्यास समाजव्यवस्था अनुकूल असावी लागते. आजच्या समाजव्यवस्थेत असंख्य माणसांच्या बाबतीत समाजव्यवस्था अशा साधनेस वाव ठेवत नाही. त्यासाठी तर क्रांतिकारक समाजपरिवर्तनाची गरज असते. आत्मज्ञानाची व सृजनाची क्षमता नाकारणाऱ्या मार्गांनी आधी वेगळी समाजव्यवस्था निर्माण करू आणि मग या प्रतिमेनुसार माणसे घडतील व माणसामाणसांचे संबंध योग्य आकार धारण करतील हा भ्रम आहे. परिवर्तनाची साधने

आणि प्रक्रियाच अशा असायला हव्यात की त्यातून परिवर्तनाच्या ओघात परिवर्तनासाठी झटणारी माणसे आत्मज्ञानी व प्रतिभावंत बनतील 'जनसंघटना' व 'जनसत्ता' हे शब्द वापरणाऱ्या तरुण मंडळींनी वास्तविक हे उत्तर द्यायला हवे.

पण हे उत्तर सहसा ही तरुण मंडळी देत नाही.

संसदीय लोकशाही प्रक्रियेत सहभागी होणारे पक्ष व संघटना, त्या चौकटीत चालविल्या जाणाऱ्या चळवळी आपल्या सहभागाच्या द्वारे राज्यक्रांती घडवून आणण्यास असमर्थ बनतात, या भ्रष्ट होतात आणि सत्ता उपभोगण्यात समाधान पावतात, असे या तरुण मंडळीना दिसते. शोषित-पीडित जनतेच्या नावाने शोषक वर्गाच्या हाती हिंसेची साधने इतकी एकवटलेली आहेत, त्यांचे बळ तुलनेने इतके अधिक आहे की धर्मयुद्धाची पथ्ये पाळणे मूर्खपणाचे ठरेल असा युक्तिवाद पुढे येईल. व्यवहारात तो खराही आहे. पण जे धर्मयुद्ध नाही त्याचे आंतरिक मानसिक परिणामही काही वेगळेच होतात हे ध्यानात घेतले पाहिजे. त्यांची अप्रतिष्ठा करतात तेव्हा ती सर्व भयमुक्त होतात असे त्यांच्या नंतरच्या आयुष्यावरून आपणांस आढळते का?

निर्भय माणसाकडून घडणाऱ्या हिंसेचा प्रसंग कोणच्या प्रकारचा असेल? खुलेपणाने, प्रतिपक्षीयास बरोबरीने वागवून, त्यालाही तयारीसाठी अवसर देऊन, मरणाचा धोका तितक्याच प्रमाणात स्वीकारून जेव्हा एखादा माणूस किंवा समूह उघड्या डोळ्यांनी 'मरेन किंवा मारेन' या तयारीने युद्धात उतरतो तेव्हा ती हिंसा निर्भय माणसाने केलेली हिंसा असेल. ते धर्मयुद्ध असेल. जे हिंसक कृत्य करीत असताना प्रतिपक्षाची माणूस म्हणून पूर्ण प्रतिष्ठा राखली जात असेल, त्याला समान वागणूक मिळत असेल, त्या हिंसक कृत्यातून माणूस निर्भय बनू शकतो. पण त्या हिंसेतले मर्मही यातच आहे की एका बाजूला नश्वर देहाची असक्ती, त्या माणसाची, गळून पडलेली असते आणि दुसऱ्या बाजूला प्रतिपक्षातल्या माणूसत्वाचा पूर्ण सन्मान केला जात असतो. या दोन गोष्टी शस्त्र हाती न घेताही साधल्या जाऊ शकतात. शोषित-दलित व्यक्तीचे आंतरिक मानस परिवर्तन घडवून आणण्यासाठी हिंसेचा वापर करण्याची म्हणून अटळ गरज नाही.

खुली व सर्वांच्या सहभागाने चालते अशा समाजात एका मर्यादेपर्यंत हिंसक मार्गांचा व साधनांचा वापर ‘जनसामान्यांच्या हाती सत्ता’ निर्माण करण्याच्या आड येणार नाही. हिंसक मार्गाची निवड केल्यानेही अधिकारांच्या श्रेणी निर्माण होत नाहीत ही ती मर्यादा होय. आधुनिक समाजामध्ये ही शर्त पाळली जाणे जवळपास अशक्य आहे ही गोष्टदेखील लक्षात येईल. त्यामुळे वरील प्रश्नाचे उत्तर होकारार्थी देणे आजच्या समाजांच्या संदर्भात शक्य नाही.

ज्या शोषकाच्या समोर कालपर्यंत ती व्यक्ती लाचारीने आणि भीतीने हात जोडून आणि मान वाकवून उभी राहत असे तीच व्यक्ती मान ताठ करून आणि डोळ्यांस डोळा भिडवून उभी राहते तेव्हा एक प्रचंड मानसिक क्रांती घडून येते, पण या आंतरिक मानसिक क्रांतीमध्ये हिंसेचे स्थान काय? द्वेष, सूडबुद्धी या प्रकारचे विकार जागृत करण्यातून ही क्रांती घडून येत नाही तर भयमुक्त झाल्याने क्रांती घडून येते.

खरा प्रश्न तर पुढेच आहे. हाती शस्त्र असल्यावरच जो भयमुक्त होतो तो खरोखरीच भयमुक्त झालेला असतो का? पाचपन्नास माणसे दोन-चार जणांना घेरून त्यांना जीवे मारतात किंवा प्रस्थापित समाजाच्या चौकटीत शुद्धता बाळगून संघटना बांधावी लागली, कृती करावी लागली की त्या संघटनेची, कृतीची रचना एका विशिष्ट पद्धतीची राखणे अपरिहार्य बनते. मोजक्या सूत्रधारांच्या हाती सत्ता हुकूमशाही पद्धतीने एकवटण्याची गरज पडते आणि त्या रचनेतून अशा कृतीचे सूत्रचालन करणाऱ्यांच्या हाती सत्ता एकवटते. जो निर्णयप्रक्रियेत भाग घेतो, जो जबाबदारीने अधिकार राबवतो त्याच्या हाती सत्ता गोळा व्हावी ही गोष्ट स्वाभाविकच आहे. जनसामान्यांच्या हाती पुढारीपण व सत्ता असावी असे आपले ध्येय असेल तर जनसामान्यांना निर्णयप्रक्रियेत व निर्णयाची राबवणूक करण्यात समानत्वाने सहभागी होता येईल असे मार्ग व साधने वापरण्याची गरज आहे. हे मार्ग व ही साधने वापरण्यासाठी गुप्ततेची, आदेशात्मक सर्वंकष नियंत्रणाची गरज नसावी ही फार महत्त्वाची गोष्ट आहे. हिंसक मार्गाचा वा साधनांचा वापर ‘जनसामान्यांच्या हाती सत्ता' हे ब्रीदवाक्य

मानणारे मग करू शकतात का? कधी करू शकतात? ज्या समाजात प्रत्येकच जण शस्त्रधारी आहे, शस्त्राच्या वापराच्या हेतूमुळे जेथे कोणतीही गुप्तता पाळावी लागत नाही, आणि जिथे निर्णयप्रक्रिया म्हणून प्रस्थापित राजकीय पक्षांच्या व चळवळींच्या बाहेर राहून, स्वतंत्र लहान गट करून क्रांतिकारक समाजपरिवर्तनाचे काम करणारी पंचविशी तिशीतली तरुण मंडळी हे आजच्या परिस्थितीचे उत्साहवर्धक वैशिष्ट्य आहे. 'पॉवर टू द पीपल' हे यांचे ब्रीदवाक्य आहे. लोकांच्या वतीने, लोकांच्यासाठी नव्हे तर लोकांशी एकरूप होऊन, त्यांच्याबरोबर राहून परिवर्तनाचे काम करण्याविषयी यांचा आग्रह आहे. संसदीय लोकशाहीच्या चौकटीतील निवडणूकप्रधान राजकारण आणि त्याद्वारे घडून येणारे सत्तांतर यामधून गोरगरिबांचे स्वराज्य निर्माण होणार नाही; जनसंघटनांच्या आधारे जनआंदोलने उभारूनच, जनतेच्या सार्वत्रिक उठावातूनच प्रस्थापित समाजव्यवस्था उखडली जाईल अशी नवी समाजरचना अस्तित्वात येईल असा यांचा ठाम सिद्धांत आहे. ही तरुण मंडळी जवळपास सर्व संघर्षवादी, त्यातही वर्गसंघर्षवादी आहेत.

शोषक आणि शोषित असे समाजाचे दोन भाग ते करतात - शोषिकांना उद्देशून श्रमिक, कष्टकरी असे शब्द वापरण्याचीही पद्धत काही गटांत आहे. शोषित, दलित, पीडित, कष्टकरी, श्रमिक हे सर्व जनसामान्य. शोषक वर्गाविषयी या तरुण-तरुणींना पक्के शत्रुत्व वाटते. लोकलढ्याच्या ओघात शोषक वर्गाच्या संदर्भात हिंसा घडली तर यांना त्यात काही वावगे वाटत नाही. यांचा साध्यसाधन विचार शोषितांपुरताच सीमित आहे असे म्हणता येईल.

पारंपरिक राजकारणासंबंधीचे यांचे आक्षेप अनेक आहेत. त्यातला एक मुख्य आक्षेप असा की पुढारी आपल्या व्यक्तिगत वा पक्षीय हितसंबंधांसाठी लोकांना राबवून घेत असतात. त्यांची निष्ठा लोकांना असत नाही. म्हणून ज्या संघटनांमध्ये धंदेवाईक पुढारी नाहीत अशा नव्या धर्तीच्या जनसंघटना बांधण्याबद्दल यांचा कटाक्ष आहे.

वेगवेगळ्या गटातील या वळणाच्या तरुण मंडळींशी अनेकवार चर्चा करण्याचा योग आला. त्यातून असे नजरेला आले की काही मुद्द्यांबाबत अधिक स्पष्टता होण्याची गरज आहे. या स्पष्टतेच्या अभावी या तरुण मंडळींच्या प्रयत्नांची परिणती असलेल्या राजकीय पक्षांच्या दावणीला बांधली जाण्यात तरी एक होईल किंवा यांना स्वतःची एक वेगळी राजकीय पक्ष-संघटना एक दिवस शोधावी लागेल.

अशा तीन मुद्द्यांचा या लेखात विचार करावयाचा आहे. (१) कार्यकर्त्याची विचारप्रणाली, (२) हिंसा-अहिंसा विवेक आणि (3) राज्यक्रांती

**(१) कार्यकर्त्याची विचारप्रणाली**

विचारप्रणाली हा शब्द इंग्रजीतील आयडिऑलॉजी या शब्दाला पर्याय म्हणून इथे लक्षात घ्यावयाचा आहे. आपणास अभिप्रेत असलेला नवीन समाज प्रस्थापित करण्याच्या संदर्भातील सर्व प्रश्नांची उत्तरे आधीच ज्यात मिळतात अशी विचारप्रणाली ही सर्वांगपरिपूर्ण तत्त्व, विचार व श्रद्धा व्यवस्था असते. लोकांच्यामध्ये जाऊन काम करण्यासाठी कार्यकर्त्याने अशा विचारप्रणालीने शस्त्रसज्ज होऊन मगच रणक्षेत्रात पाऊल टाकले पाहिजे असे फार आग्रहाने मांडले जाते.

सर्व प्रश्नांची उत्तरे आपण आपल्या विचारप्रणालीच्या आधारे आधीच दिली आहेत ही भूमिका घेऊन कार्यकर्ता लोकांत जातो तेव्हा त्याची भूमिका सर्वज्ञाची ठरते. कार्यकर्त्याच्या विचारप्रणालीत अधूनमधून फेरबदल होत राहिले तरी लोकांच्या संदर्भात त्याची भूमिका सर्वज्ञाचीच राहते. "तुमच्या मुक्ततेची गुरुकिल्ली घेऊन आम्ही आलेलो आहे" असे कार्यकर्ता म्हणते तेव्हाचा लोकांचाही 'अडाणी' म्हणून निवाडा त्याने केलेला असतो. दैनंदिन ऐहिक जीवनाच्या पातळीवर लोकांसारखेच जगण्याचा टोकाचा आग्रह बाळगल्याने या वस्तुस्थितीत फरक पडत नाही. कार्यकर्ता आणि लोक यांच्यात मुळातच असे अंतर निर्माण जर होत असेल तर जनसंघटनेतही कार्यकर्ता आणि लोक अशा दोन श्रेणी निर्माण झाल्याशिवाय कशा राहणार? कार्यकर्ता सर्वज्ज्ञ आणि लोक अडाणी असे जर असेल, आणि क्रांती होणे न होणे

विचारप्रणालीबरहुकूम कृती घडण्यावर अवलंबून असेल तर कार्यकर्त्याचे सतत नियंत्रणही आवश्यक ठरते. लोकांनीच स्वतःचे पुढारीपण करावे या भूमिकेशी येथे विसंवाद उत्पन्न होतो.

कार्यकर्ता आणि लोक यांच्यात सर्व बाबतीत सारखेपण असत नाही. काही एका विचारप्रणालीने प्रेरित झाल्याखेरीज कार्यकर्ता लोकांमध्ये काम करण्यासाठी जाणारही नाही. या दोन गोष्टी इतक्या निर्विवाद आहेत की त्या नाकाराव्यात तरी कशा?

आपल्याजवळ जे काही 'विशेष' आहे त्याने आपणास मार्गदर्शनाचा व नियंत्रणाचा अधिकार प्राप्त होत नाही, आणि आपणाजवळ जसे काही विशेष आहे असे आपल्या ठिकाणी काही उणेपणही आहे, तसेच लोकांच्यापाशीही उणेपणाबरोबर काही विशेष गोष्टी पण आहेत, ही दुहेरी दृष्टी कार्यकर्त्याने बाळगली तर बिनतोड वाटणारा पेच बिनतोड राहत नाही.

लोकांजवळ सहसा आढळत नाही अशी विचारप्रणाली ही विशेष गोष्ट कार्यकर्त्याजवळ असते. ही विचारप्रणालीदेखील कार्यकर्त्याने कोणत्या वृत्तीने धारण करावी व लोकांपुढे ठेवावी?

काही निरीक्षण, थोडासा अनुभव आणि पुष्कळसे पुस्तकी वाचन यांतून बहुधा विचारप्रणालीचा स्वीकार कार्यकर्त्याने केलेला असतो. कार्यकर्त्याचा मनोपिंडही त्याच्या विचारप्रणालीच्या निवडीमागे असतो. त्याने स्वीकारलेली विचारप्रणाली बहुधा बहुंशः वेगळ्या स्थलकालाच्या संदर्भात मांडलेली असते. विचारप्रणाली परिस्थितीला लागू करण्याच्या संदर्भात या सगळ्या उण्या गोष्टी आहेत. कार्यकर्त्याच्या विशेषत्वाचीच ही अटळ अशी न्यूनत्वाची बाजू असते. एखाद्याने स्वतःच्या अनुभव-निरीक्षणाच्या आधारे काही मूल्ये जाणीवपूर्वक स्वीकारून, काही ध्येये डोळ्यांसमोर ठेवून आपली आपण विचारप्रणाली घडविली असे घटकाभर मानले तरीही, कोणतीही एक व्यक्ती ही वास्तव, तेही नित्य बदलत जाणारे वास्तव परिपूर्ण जाणून घेऊ शकत नाही. व्यक्तीचा अनुभव व निरीक्षण सीमितच राहणार. हे उणेपणही अटळ आहे. 'आजच्या घडीला ही माझी विचारप्रणाली आहे, पण ती नवीन अनुभवाने, निरीक्षणाने वा पुनर्विचाराने कधीही बदलू शकते, कामचलाऊ म्हणूनच मी तिच्याकडे पाहतो' अशी वृत्ती कार्यकर्त्याने धारण केली तर स्वतःकडे सर्वज्ञतेची भूमिका त्याला घ्यावी लागणार नाही. आणि ज्या लोकांमध्ये तो कामाला जाईल त्यांच्याशी, आपल्याजवळचे विशेषत्व न गमावताही, बरोबरीच्या नात्याने तो संवाद करण्याच्या भूमिकेत येईल. लोकांजवळही एक ना एक विचारप्रणाली असते आणि त्यापाठीशी काही अनुभव, निरीक्षण आणि (परंपरेने चालत आलेला) विचार असतो. त्यांचाबरोबर होणाऱ्या संवादातून न्यूनाधिक दोन्हीही समोर येईल.

विचारप्रणालीच्या संदर्भात ही वृत्ती धारण करण्याच्या आड काही गोष्टी येतात. सामान्यतः सर्व विचारप्रणाली आपणाजवळ सर्व प्रश्नांची उत्तरे आहेत असा दावा करीत असतात. आणि विचारप्रणाली स्वीकारणारा या दाव्याचाही स्वीकार करीत असतो. अशा विचारप्रणालीच्या स्वीकाराने कार्यकर्त्याला फार सुरक्षित व निःशंक वाटते. या सुरक्षित व निश्चिंत मानसिक कोषातून बाहेर पडण्यास कार्यकर्त्यास फार भीती वाटते. त्याहीपेक्षा कार्यकर्त्याचा यात हितसंबंधही गुंतलेला असतो. विचारप्रणालीवरील मक्तेदारी त्याला श्रेष्ठत्व आणि अधिकार प्राप्त करून देत असते. विचारप्रणालीवरील 'मालकी'च्या आधारे तो इतरांवर सत्ता गाजवू शकतो.

कार्यकर्त्यांची विचारप्रणाली जर ठाम नसेल तर तो स्थिरपणे परिवर्तनाचे काम कसे करू शकेल अशी प्रामाणिक शंकाही कार्यकर्त्यांना पडते. तसेच शास्त्रभूत विचारप्रणाली ही स्थलकालातीत अविचल राहणारी असते असाही 'शास्त्रीयते'चा अर्थ लावला जातो. त्यातून आपली विचारप्रणाली शास्त्रपूत आहे म्हणजेच ती परिपूर्ण व अपरिवर्तनीय आहे असा अट्टाहास केला जातो.

खुद्द विज्ञानाच्या क्षेत्रात कोणत्याही 'नियमां'विषयीही, अनुभवाने तो खोटा पडेपर्यंत मानावा, अशी भूमिका बाळगून शास्त्रज्ञ वास्तव अधिक सूक्ष्मात जाऊन समजावून घेण्याचा प्रयत्न करीत असतात. आपल्या या विज्ञानसाधनेच्या ओघात ते जुन्या

नियमांना फाटा देत असतात. वैज्ञानिक जर आपल्या शोधांविषयी अशी कामचलाऊ दृष्टी बाळगूनही स्थिरचित्ताने साधना करू शकतो तर क्रांतिकारक समाजपरिवर्तनाच्या क्षेत्रातही विज्ञाननिष्ठेचा आग्रह धरणाऱ्यास ही गोष्ट सहजसाध्य व्हावयास पाहिजे.

मूल्यनिष्ठा आणि ध्येयदृष्टी हे विचारप्रणालीतले दोन घटक सापेक्षतः स्थिर व अविचल राहणारे आहेत. माणसाचे माणूसपण कशात आहे, माणसांमाणसांमधील संबंध कसे असावेत, आणि मानवी जीवनाचे श्रेय कशात आहे याविषयीची धारणाही अशी सापेक्षतः स्थिर गोष्ट आहे. कार्यकर्त्याने विचारपूर्वक जर एखाद्या विचारप्रणालीचा कामचलाऊ स्वीकार केल असेल तर, त्याला ही खात्री बाळगण्यास अडचण जाऊ नये की, विचारप्रणालीविषयी पुनर्विचारातून या गोष्टी अधिक परिशुद्ध होतील, निर्दोष होतील.

पण पुष्कळांच्या बाबतीत खरी अडचण पहिल्या दोन कारणांशी संबंधित असल्याचे जाणवते. समाजपरिवर्तनाच्या कार्यात सत्तालालसेपोटी पडणारे, किंवा कार्यात पडल्यानंतर ज्यांची सत्तालालसा जागी होते असे कार्यकर्ते असतात आणि अशांच्या हातून विचारप्रणालीचा उपयोग सत्तासंपादनासाठी वा सत्ता गाजविण्यासाठी केला जातो. अनुभव/कृती यांमधून, इतरांच्या अनुभव, निरीक्षण व चिंतनाच्या आधारे आपली विचारप्रणाली सतत परिष्करणासाठी खुली आहे अशी भूमिका घेण्यास त्यांचा साहजिकच विरोध असतो. विचारप्रणालीमध्ये फेरबदलही ते आपल्या सत्तेस बाधा न येईल अशा एका खाजगी प्रक्रियेद्वारा करण्याची दक्षता घेतात. अशांच्या बाबतीत, जनसंघटना, जनआंदोलन, जनसत्ता, ‘पॉवर टू द पिपल’, या शब्दप्रयोगाचा वापर केवळ एक शाद्बिक टूम म्हणून आहे ही गोष्ट समजून घ्यावी

क्रांतिकारक समाजपरिवर्तनाकडे वळणाऱ्या काही तरुणांच्या ठिकाणी मानसिक दुबळेपण असते. एका परिपूर्ण विचारप्रणालीच्या आश्रयाने अशी दुबळी माणसे एक शक्ती स्वतःच्या ठिकाणी अनुभवतात. मनाची निश्चिंतता अनुभवतात. सर्वशक्तिमान अशा विचारप्रणालीचा वा चळवळीचा वा नेत्याचा वा राज्यसत्तेचा आश्रय ते धुंडाळीत असतात. आपल्या मानसिक दुबळेपणातून बाहेर पडत नाहीत तोवर असे कार्यकर्ते बरोबरीच्या नात्याने, खुलेपणाने जनसंघटनेचे काम करू शकत नाहीत.

समजावून घेण्याची गोष्ट अशी आहे की, आपली विचारप्रणाली शास्त्रज्ञाच्या प्रायोगिक वृत्तीतून पुनर्विचारासाठी सदैव खुली ठेवणारा, सर्वांकडूनच टीकाटीप्पणीचे स्वागत करणारा, खुल्या प्रक्रियेद्वारा आपल्या विचारप्रणालीची सफाई करीत राहणारा कार्यकर्ताच जनसामान्यांबरोबर समानतेच्या बैठकीवरून व्यवहार करू शकेल. असा कार्यकर्ताच संघटनेच्या अंतर्गत 'पॉवर टू द पीपल'चा प्रत्यक्ष व्यवहार करील.

'लोकांच्या हाती अधिकार/सत्ता' या आपल्या ब्रीदाच्या आड आपली विचारप्रणालीची विशेषता, आपले अधिक ज्ञान, आपला अधिक अनुभव, वा इतर कोणतीही गोष्ट येण्याची शक्यता लक्षात घेऊन कार्यकर्ता आपण होऊन योग्य ती भूमिका घेईल. आपल्याजवळ एक स्थलकालातीत परिपूर्ण अशी विचारप्रणाली आहे आणि ती पुनर्विचाराच्या पलीकडे आहे असे तर तो म्हणणारच नाही. कारण असे म्हणणे याचा सरळच अर्थ ‘पॉवर टू द वर्कर' असा होतो याचे त्याचे भान सुटणार नाही. पण तो एक तयार विचारप्रणाली लोकांपुढे न ठेवण्याचे पथ्य सांभाळील. शोषित, श्रमिक जनता पिढ्यानपिढ्या असेच मानीत आली आहे की आपल्याला बुद्धीच्या गोष्टी जमणाऱ्या नाहीत. ते काम शिकल्या-सवरलेल्यांचे. ही त्यांची समजून भ्रामक आहे ही अनुभूती प्रत्यक्ष व्यवहारातून लोकांना देण्याची महत्त्वपूर्ण कामगिरी कार्यकर्त्यास विशेषत्वाने पार पाडावयाची आहे. एक तयार विचारप्रणाली लोकांसमोर ठेवण्याने त्यांची समजूत पक्कीच होईल हे कार्यकर्ता जाणील. परिणामी तयार विचारप्रणाली घेऊन जरी तो लोकांकडे गेला असला तरी ती त्याच्याही ठिकाणची गळून पडेल.

माणसाविषयी एक धारणा, त्यातून निवडलेली मूल्ये आणि अंगिकारलेली ध्येयदृष्टी एवढी शिदोरी कार्यकर्त्यासाठी पुरेशी आहे. आयती, तयार विचारप्रणाली लोकांच्या गळी उतरविणे ही गोष्ट क्रांतिकारक समाजपरिवर्तनाच्या जनाधारित

प्रक्रियेवर विपरीत आघात करणारी आहे.

**(२) हिंसा-अहिंसा विवेक**

शोषक आणि शोषित यांच्यातील शोषितांकडून शोषकांविरुद्ध हिंसा घडली तर ती गोष्ट गैर मानण्याचे कारण नाही. अशी या वर्गसंघर्षवादी तरुणांची सामान्यतः भूमिका आहे. आजच्या समाजव्यवस्थेत उघड आणि प्रच्छन्न हिंसा इतकी घडत असताना शोषितांकडून थोडीफार हिंसा घडली तर तिची खास दखल घेण्याचे कारण असा त्यांचा युक्तिवाद असतो. त्याहीपुढे जाऊन असे म्हणता येईल की, अनेकांना हिंसेमध्ये काही विधायक गुण आढळतात. शोषकांविरुद्धचा त्वेष आणि त्यांच्यावर उगारलेले शस्त्र ही शोषकांच्या ठिकाणचे भय काढून टाकण्यासाठी, त्यांच्या ठिकाणचे स्वत्व जागे करण्यासाठी आवश्यक आहे असे त्यांचे प्रतिपादन असते.

यासंदर्भात एक गैरसमजही फार रूढ आहे. हिंसा करावयाची नाही याचा अर्थ शोषकाने स्वतःहून शोषण करावयाचे सोडून देईतो मुकाट्याने अन्याय, अत्याचार व शोषण सहन करीत राहावयाचे, त्याची मनधरणी करीत राहावयाचे, असा केला जातो. आणि यालाच अहिंसेचा मार्ग असे मानले जाते. अहिंसेचा मार्ग म्हणजे निष्क्रिय मनधरणीचा मार्ग अशी एकदा समजूत करून घेतल्यावर हिंसेच्या बाजूने बोलल्यास जोर चढतो.

शोषकांविरुद्ध शोषितांनी हिंसा प्रसंगी करावी की नाही या प्रश्नाचे ‘करावी' असे उत्तर तूर्त आपण देऊ आणि या प्रश्नाचा विचार जनसंघटना, जनआंदोलन, जनांचे पुढारीपण या संदर्भातच तेवढा करू, अशी भूमिका घेतल्यावर बहुतेक वेळा असे आढळते की असा विचार करण्याची आवश्यकताही लक्षात आलेली नाही.

समाजपरिवर्तनाच्या संदर्भात हिंसेचा वापर कशासाठी करावयाचा, या प्रश्नातच एक गोष्ट अध्याहृत आहे. प्रक्षोभ अनावर होऊन हिंसेचा स्फोट होतो असे प्रसंग लोकांच्या बाजूने घडतात, पण त्यांचा आपण विचार करीत नाही. परिवर्तनाचे एक शस्त्र/साधन म्हणून जाणीवपूर्वक करावयाच्या हिंसेचा विचार आपण करीत आहोत. हिंसेच्या या दोन वेगळ्या कोटी आहेत.

याची वेगवेगळी उत्तरे देता येतात. (१) प्रतिपक्षावर मात करून त्याच्या हातातील साधने, व सत्ता हिसकावून घेण्यासाठी (२) शोषित, दलित व्यक्तीचे आंतरिक मानस परिवर्तन घडवून आणण्यासाठी. (३) समाजाला एकंदर भीतीचे, दहशतीचे वातावरण निर्माण करून अस्थिरता उत्पन्न करण्यासाठी (४) असे प्रतीकात्मक हिंसक कृत्य करून, त्यापोटी हौतात्म्य पत्करून समाजाला भावनात्मक आवाहन करावयाचे. (५) शोषक व्यवस्थेतला म्होरक्या उडवून ती दुबळी करावयाची.

राज्यसत्ता ताब्यात घेऊन समाजव्यवस्था बदलण्याची कल्पना असेल तर हिंसक उठाव हा समाजव्यापी व्हावयास हवा. या मुद्द्याचा विचार राज्यक्रांतीच्या संदर्भात करायला हवा. बाकीच्या उद्देशांपैकी ३, ४ व ५ या उद्देशांचा एकत्रित विचार करता येईल. (२ चा विचार वेगळा करावयास हवा) नियोजनपूर्वक केलेल्या हिंसक कृत्यांमुळे हे परिणाम प्रत्यक्षात साधले जातात असे गृहीत धरून विचार करू. या कृत्यांनी जनसामान्यांच्या संघटनेचे, त्यांनी स्वतःचे पुढारीपण स्वतःच करण्याचे, त्यांच्या हाती सत्ता घेण्याचे पाऊल खरोखरी पुढे पडते का? (३) समाजात जी अस्थिरता निर्माण होते ती राज्यक्रांती करण्याच्या दृष्टीने पुढे जाऊन उपकारक ठरण्याची अशी शक्यता आहे तसा अशा कृत्यांचा परिणाम म्हणून दडपशाही अधिक निर्घृण होण्याचीही शक्यता असते. अशा दडपशाहीमुळे जनसंघटनांचे पाऊल पुढे पडायच्या ऐवजी मागेच जाते. भारतीय स्वातंत्र्यलढ्याच्या प्रदीर्घ काळात असे काही दडपशाहीचे कालखंड आपण अनुभवले आहेत. शासकीय दडपशाहीमुळे लोकांची मने कडवट बनतात. त्यांच्या ठिकाणचा असंतोष धुमसत राहतो. आणि दडपशाहीलाही न डरता प्रतिकार करणाऱ्या व्यक्तींविषयी त्यांना अतीव कौतुक व आदर वाटतो. पण लोक भिऊन मागे हटतात आणि उठाव काही व्यक्तींना येतो ही गोष्ट खरीच. हा परिणाम ‘पॉवर टू द पीपल’ हे ब्रीदवाक्य समोर ठेवणाऱ्यांच्या दृष्टीने विपरीतच म्हणावयास हवा. सशस्त्र दहशतवादी कृत्ये करणाऱ्या व्यक्ती व गट यांच्याविषयी समाजात आकर्षण व कौतुक आढळते. पण त्यांची

दहशतही निर्माण होते. शोषित जनसामान्यांच्या दृष्टीने असे गट हे नवे सत्ताधारीच असतात. आणि त्यांना वचकून, दबकून ते वागतात. (४) व्यक्तिगत वा गट हौतात्म्याने समाजातील अनेक तरुणांना स्फूर्ति मिळते आणि लोकांच्या भावना उचंबळूनही येतात. पण त्या व्यक्तीने वा गटाने केलेल्या हिंसेमुळे हे घडून येत नाही. ध्येयनिष्ठेसाठी आनंदाने स्वीकारलेल्या देहदंडाचा तो परिणाम असतो. प्रतिपक्षीयाने केलेल्या हिंसेचा तो परिणाम असतो. हा परिणाम साधण्यासाठी परिवर्तनास बांधिलकी असलेल्याने हिंसा करण्याची गरज नसते. पण या प्रकारच्या हौतात्म्याचा, देहदंडाचा आणखीही एका प्रकारे विचार करण्याची गरज आहे. असे हौतात्म्य व्यक्तीचे वा लहान गटाचे असते तेव्हा सत्ता/अधिकार या गोष्टीही अशी कृत्ये करणाऱ्या व्यक्तींच्या वा गटाच्या ठिकाणी केंद्रित होतात. जनसामान्यांची सक्रियताही वाढत नाही की त्यांची संघटना वा सत्ता. अशा विभूतींशी, हीरोंशी तुलना करून माणसे, आपली काही ती लायकी नाही म्हणून निष्क्रिय बनतात. (५) या प्रकारच्या कृत्यानेही सर्वसामान्य लोकांची संघटना वा बळ वाढत नाही. असे कृत्य यशस्वीपणे करणाऱ्या टोळीची दहशत तेवढी निर्माण होते.

चौथ्या व पाचव्या प्रकारात मोडणारी कृती ही मुळातच जनतेने करावयाची सामूहिक कृती नाही. पण तिसऱ्या प्रकारात मोडणारी कृती ही जनतेने सामूहिकरीत्या केलेली कृती असेल तर, काही फरक पडतो का त्याचा विचार करू. एखाद्या गावात वा लहान क्षेत्रात त्या गावातील, क्षेत्रांतील पाचसातशे लोक जमीनदारांच्या व सावकारांच्या घरांवर चालून जातात व त्यांची घरे, मालमत्ता लुटतात, त्यांचा विध्वंस करतात किंवा त्यांना ठार मारूतात. अशी घटना घडू शकते. पण आजच्या संदर्भात ही कृती जर जाणीवपूर्वक, नियोजित डावपेच म्हणून करावयाची झाल्यास तिच्याविषयी पुष्कळ गुप्तता बाळगावी लागेल, तिचे परिपूर्ण नियोजन करावे लागेल, आणि तिचे प्रथमपासून कठोर नियंत्रण करावे लागेल. गुप्ततेच्या शर्तीमुळे या कृतीचे सुत्रधार वेचक व्यक्तीच तेवढ्या असू शकतील आणि त्यांच्यात अधिकाराची श्रेणी फार काटेकोर असावी लागेल. परिणामतः अशा यशस्वी कृतींमधून सूत्रधारांची दहशत आणि सत्ताच प्रस्थापित होते. इतकेच नाही तर मूठभर सूत्रधार सोडले तर इतरांना केवळ इमानेइतबारे सांगकाम्याची भूमिका वठवावी लागते. अशा कृतींच्या बाबतीत काही वेळा उजवा हात काय करीत आहे ते डाव्या हाताला माहीत असून चालत नाही. अशा कृतीतून जनसामान्य शक्तिवान व सत्तावान होण्याच्या दृष्टीने पाऊल पुढे पडत नाही.

आयडियालॉजीची पकड मोठी जबरदस्त आढळते. कार्यकर्त्यांची एक ना एक आयडियालॉजी (विचारप्रणाली) असतेच आणि असलीच पाहिजे असा आग्रह आढळतो. विचारप्रणालीला असलेली बांधिलकी लोकाधीष्ठित समाजपरिवर्तनाच्या आड येते.